“००२९-जमीन महसूल”, “००४५-करमणूक शुल्क” व “०८५३-गौण खनिजे उत्खनन नियमापासून मिळणाऱ्या जमा रकमा” या लेखाशीर्षांखाली वसूल करण्यात येणारा महसूल “शासकीय जमा लेखांकन प्रणाली” (GRAS) या प्रणालीद्वारे जमा करण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः आरईव्ही-०६१३/प्र.क्र.८९/टी-२**
१ ला मजला, मुख्य इमारत,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
तारीखः २६ जून, २०१५.

**वाचा** :- शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.संकीर्ण-१००९/प्र.क्र.३२/भाग-१/कोषा प्र-५, दि.३०.७.२०१३

**प्रस्तावना :-**

राज्य शासनाने वित्त विभागाच्या नियंत्रणाखाली व्हर्च्युअल ट्रेझरीची स्थापना केलेली असून सहभागी बँकांच्या पेमेंट गेटवेचा वापर करुन इलेक्ट्रॉनिक माध्यमातून “शासकीय जमा लेखांकन प्रणाली” (Government Receipt Accounting System-GRAS) याद्वारे शासनाच्या विविध विभागांशी संबंधित जमा रकमांचा भरणा करण्याची सुविधा उपलब्ध करुन दिलेली आहे. या अनुषंगाने शासनाकडे जमा होणाऱ्या रकमांच्या लेखांकनासाठी व ताळमेळासाठी अवलंबावयाची कार्यपध्दती वित्त विभागाने संदर्भाधीन शासन निर्णय, दि.३०.७.२०१३ अन्वये विहित कलेली आहे.

महसूल विभाग हा शासकीय महसूल रकमांच्या वसुलीबाबत एक प्रमुख विभाग आहे. या विभागाकडून मुख्यत्वेकरुन “००२९-जमीन महसूल”, “००४५-करमणूक शुल्क” व “०८५३-गौण खनिजे उत्खनन नियमापासून मिळणाऱ्या जमा रकमा” या लेखाशीर्षांखाली महसूल वसूल करुन तो शासनाच्या तिजोरीत जमा केला जातो. सध्याच्या महसूल गोळा करण्याच्या प्रचलित पध्दती ऐवजी “GRAS”प्रणालीचा उपयोग केल्यास महसूल वसुलीची कार्यपध्दती सुकर होईल. त्याच बरोबर जमा करण्यात येणाऱ्या रकमांचा कोषागार कार्यालयाशी ताळमेळ घेण्याची प्रक्रीया अत्यंत सुरळीत होवून त्यामुळे महसूल अधिकारी/ कर्मचारी यांच्या श्रम व वेळेत निश्चितच बचत होणार आहे. या पार्श्वभूमीवर “GRAS”प्रणालीचा वापर महसूल विभागासाठी संपूर्ण राज्यभर सुरु करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यास अनुसरुन शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतलेला आहे :-

**शासन निर्णय :-**

१. महसूल विभागाकडून जमा करण्यात येणारा महसूल “शासकीय जमा लेखांकन प्रणाली” (Government Receipt Accounting System- GRAS) या प्रणालीद्वारे शासनाच्या तिजोरीत जमा करण्याची पध्दत संपूर्ण राज्यात दि.१.८.२०१५ पासून लागू करण्यात येत आहे. राज्यातील सहा महसूली विभागांतर्गत सर्व

जिल्हाधिकारी कार्यालये व त्या अंतर्गत उपविभागीय आणि तहसिल कार्यालयांमध्ये सदर प्रणाली दि.१.८.२०१५ पासून न चुकता लागू होईल हे सुनिश्चित करण्याची जबाबदारी संबंधित विभागीय आयुक्त व जिल्हाधिकारी यांची राहील.

२. GRAS प्रणालीची राज्यात दिनांक १ ऑगस्ट, २०१५ पासून अंमलबजावणी करण्याच्या अनुषंगाने सदर प्रणालीबाबतचे प्रशिक्षण वित्त विभागाच्या व्हर्च्युअल ट्रेझरी कार्यालयामार्फत देण्यात येऊन ते दि.३१.७.२०१५ पर्यंत पूर्ण करण्यात यावे. याबाबतचा प्रशिक्षण कार्यक्रम संबंधित विभागीय आयुक्त व जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमी अभिलेख, पुणे यांनी त्यांच्या अधिनस्त कार्यालयांसाठी व्हर्च्युअल ट्रेझरी कार्यालयाशी विचार विनिमय करुन व समन्वय साधून आयोजित करावा व त्यांच्या विभागासाठी व प्रत्येक जिल्ह्यासाठी “मास्टर ट्रेनर्स” तयार करावेत. अशा “मास्टर ट्रेनर्स”यांच्याद्वारे GRAS प्रणालीचे प्रशिक्षण संबंधित सर्व अधिकारी/ कर्मचारी यांना देण्याची व्यवस्था करण्यात यावी.

३. GRAS प्रणाली विषयी अतिरिक्त प्रशिक्षणाची गरज भासल्यास त्याबाबत संबंधित विभागीय आयुक्त व जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमी अभिलेख, पुणे यांनी व्हर्च्युअल ट्रेझरी कार्यालयाशी संपर्क साधून त्यांच्या विभागात प्रशिक्षणाचे आयोजन करावे व त्याबाबतचा अहवाल शासनास सादर करावा.

४. GRAS प्रणालीद्वारे संबंधित विभाग/ कार्यालयामार्फत जमा करण्यात येणाऱ्या महसूल रकमांचा ताळमेळ हा विहित पध्दतीनुसार नियतकालिक मुदतीत घेण्यात येतो किंवा कसे व प्राप्त होणाऱ्या रकमांची चलने सेवा दिल्यावर विरुपीत (deface) करण्यात येतात किंवा कसे हे पाहण्याची जबाबदारी विभागीय स्तरावर उप आयुक्त (महसूल), जिल्हास्तरावर निवासी उपजिल्हाधिकारी व तालुका स्तरावर निवासी नायब तहसिलदार यांच्यावर सोपविण्यात यावी. तसेच GRAS प्रणालीच्या लॉगीन (Login) साठी पुरविण्यात आलेल्या पासवर्डबाबत गोपनियता पाळण्याची जबाबदारीही वरील अधिकारी यांच्यावरच राहील.

५. सर्व महसूली विभाग व त्या अंतर्गत क्षेत्रीय कार्यालयांमार्फत जमा करण्यात येणारा महसूल GRAS या प्रणालीद्वारे स्विकारणे, त्यामध्ये येणाऱ्या अडचणी सोडविणे याबाबतची जबाबदारी विभागीय स्तरावर तहसिलदार (महसूल), जिल्हास्तरावर लेखाशीर्ष “००२९-जमीन महसूल”च्या बाबतीत तहसिलदार (महसूल), लेखाशीर्ष “००४५-करमूणक शुल्क” च्याबाबतीत करमणूक कर अधिकारी/सहायक करमणूक कर अधिकारी/जिल्हाधिकारी यांनी पदनिर्दिष्ट केलेला करमणूक कर निरिक्षक व लेखाशीर्ष “०८५३-गौण खनिजे उत्खनन नियमापासून मिळणाऱ्या जमा रकमा” च्या बाबतीत जिल्हा खनिकर्म अधिकारी/जिल्हाधिकारी यांनी पदनिर्दिष्ट केलेला तहसिलदार दर्जाचा अधिकारी आणि तालुका स्तरावर नायब तहसिलदार (महसूल)/अव्वल कारकून (महसूल)/ट्रेझरी अव्वल कारकून यांच्यावर सोपविण्यात यावी.

जिल्हाधिकारी यांना जिल्हा/उपविभाग/ तहसिल स्तरावर वरील तीनही लेखाशीर्षांखाली शासनास देय रकमा GRAS प्रणालीद्वारे स्विकारणे, त्यामध्ये येणाऱ्या अडचणी सोडविणे याबाबतची जबाबदारी आवश्यकतेनुसार अन्य अधिकारी / कर्मचारी यांच्याकडेही सोपविता येईल.

६. जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमी अभिलेख, पुणे यांच्या कार्यालयात किंवा त्यांच्या अधिनस्त क्षेत्रीय कार्यालयांमध्ये GRAS प्रणालीद्वारे जमा करण्यात येणाऱ्या महसूल रकमांचा ताळमेळ हा विहित पध्दतीनुसार नियतकालिक मुदतीत घेण्यात येतो किंवा कसे व प्राप्त होणाऱ्या रकमांची चलने सेवा दिल्यावर विरुपीत (deface) करण्यात येतात किंवा कसे हे पाहण्याची जबाबदारी विभागीय स्तरावर उप संचालक(भूमी अभिलेख), जिल्हास्तरावर जिल्हा अधिक्षक, भूमी अभिलेख व तालुका स्तरावर उप अधिक्षक, भूमी अभिलेख

यांच्यावर सोपविण्यात यावी. तसेच GRAS प्रणालीच्या लॉगीन (Login) साठी पुरविण्यात आलेल्या पासवर्डबाबत गोपनीयता पाळण्याची जबाबदारी वरील अधिकारी यांच्यावरच राहील.

७. भूमी अभिलेख विभागांतर्गत क्षेत्रीय कार्यालयांमार्फत जमा करण्यात येणारा महसूल GRAS प्रणालीत इलेक्ट्रॉनिक पध्दतीने स्विकारणे व त्यामध्ये येणाऱ्या अडचणी सोडविणे याबाबतची जबाबदारी विभागीय स्तरावर उप संचालक भूमी अभिलेख कार्यालयातील कार्यालय अधिक्षक, जिल्हास्तरावर जिल्हा अधिक्षक भूमी अभिलेख कार्यालयातील प्रमुख लिपिक व तालुकास्तरावर उप अधिक्षक भूमी अभिलेख कार्यालयातील मुख्यालय सहाय्यक यांच्यावर राहील.

जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमी अभिलेख यांना विभागीय/ जिल्हा/तालुका स्तरावर शासनास देय रकमा GRAS प्रणालीद्वारे स्विकारणे, त्यामध्ये येणाऱ्या अडचणी सोडविणे याबाबतची जबाबदारी आवश्यकतेनुसार अन्य अधिकारी / कर्मचारी यांच्याकडेही सोपविता येईल.

८. भविष्यात GRAS प्रणालीच्या वापराबाबत क्षेत्रीय स्तरावर काही अडचणी उद्भवल्यास त्या संदर्भात कोषागार अधिकारी, व्हर्च्युअल ट्रेझरी कार्यालय, मुंबई यांच्याशी संपर्क साधून अडचणींचे निरसन करुन घेण्यात यावे.

९. GRAS प्रणालीबाबत अधिक माहिती www.gras.mahakosh.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध आहे.

१०. GRAS प्रणालीच्या वापराबाबत सामान्य जनतेला माहिती व्हावी व त्यांच्यामध्ये जागरुकता निर्माण व्हावी याकरीता विभाग, जिल्हा व तालुकास्तरावर संबंधित विभागप्रमुखांनी/ कार्यालयप्रमुखांनी सदर प्रणालीस व्यापक प्रसिध्दी देण्याची कार्यवाही करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०६२६१०४१५४२९१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Manukumar Srivastava

Digitally signed by Manukumar Srivastava
DN: c=IN, o=ALL INDIA SERVICE, ou=IAS, postalCode=110001, st=NEW DELHI, cn=Manukumar Srivastava
Date: 2015.06.26 15:45:22 +05'30'

**( मनु कुमार श्रीवास्तव )**
प्रधान सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. सर्व विभागीय आयुक्त
२. जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमी अभिलेख, पुणे
३. संचालक, लेखा व कोषागारे, नवीन शासकीय कुटीर क्र.१५ व १६, प्लॉट क्र.१७६, फ्री प्रेस जर्नल मार्ग, मुंबई-४०० ०२१.

४. सर्व जिल्हाधिकारी

५. कोषागार अधिकारी, व्हर्च्युअल ट्रेझरी, शासकीय कुटीर क्र.११, प्लॉट क्र.१७६,फ्री प्रेस जर्नल मार्ग, मुंबई-४०० ०२१.

**प्रत :-**

१) मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई-४०००३५.

२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-४०००३२.

३) मा.मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०००३२.

४) मा.राज्यमंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०००३२.

५) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई-४०००३२.

६) अ.मु.स.(वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.

७) प्र.स.(महसूल) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-४०००३२.

८) मा.महालेखापाल १ / २ (लेखापरिक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर

९) मा.महालेखापाल १ / २ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर

१०) सह संचालक, लेखा व कोषागारे, कोकण/पुणे/नाशिक, अमरावती/नागपूर/ औरंगाबाद

११) सह संचालक, स्थानिक निधी लेखा, मुंबई/पुणे/नाशिक, अमरावती/नागपूर/ औरंगाबाद

१२) कार्यासन “टी-१”, “ब-१”, “ख” महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.

१३) निवडनस्ती, टी-२ कार्यासन